**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**शासन निर्णय , वित्त विभाग क्र. अर्थसं-११.०८/ प्र.क्र. ३५ / अर्थसंकल्प-१,**
**दि. १०.०३.२००८**

**संदर्भ :-** सन २००८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २, दि. २२.०२.२००८

**शासन निर्णय**

संदर्भीत दि. २२.०२.२००८ च्या अध्यादेशद्वारे, मुंबई मोटार वाहन कर; मोटार वाहने (उतारुंवर कर आकारणी); महाराष्ट्र शिक्षण व रोजगार हमी (उपकर); विजेच्या विक्रीवरील कर ; राज्य व्यवसाय कर, व्यापार, आजीविका व नोकऱ्या यांवरील कर ; कर अधिनियम (सुधारणा) आणि रोजगार हमी (सुधारणा); आणि मुंबई राज्य टंचाई निवारण निधी (निरसन) अध्यादेश, २००८ अन्वये मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८ याच्या कलम ११ अन्वये स्थापन केलेला राज्य मार्ग निधी; मुंबई मोटार वाहने (उतारुंवर कर आकारणी) अधिनियम, १९५८ याच्या कलम ५ अ अन्वये स्थापन केलेला आरोग्य व पोषण निधी, मुंबई राज्य टंचाई निवारण निधी अधिनियम, १९५८ याच्या कलम ३ अन्वये स्थापन केलेला महाराष्ट्र राज्य टंचाई निवारण निधी; महाराष्ट्र शिक्षण व रोजगार हमी (उपकर) अधिनियम, १९६२ अन्वये स्थापन केलेला महाराष्ट्र शिक्षण उपकर निधी; महाराष्ट विजेच्या विक्रीवरील कर अधिनियम, १९६३ याच्या कलम ५ अन्वये स्थापन केलेला राज्य वीज निधी या निधींमधील सर्व प्रतिभूती (कोणत्याही रोख शिल्लक रकमा असल्यास त्यांसह) राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात आल्याचे व त्या निधीचा भाग असल्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

दि. ३१.३.२००७ अखेर उपरोक्त निधींमध्ये पुढीलप्रमाणे रकमा शिल्लक आहेत :-

(रु. हजारात)

| अ.क्र. | निधीचे नाव | दि. ३१.३.२००७ रोजीची शिल्लक |
|---|---|---|
| १ | मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८ याच्या कलम ११ अन्वये स्थापन केलेला राज्य मार्ग निधी | ९२५९८८५२ |
| २ | मुंबई मोटार वाहने (उतारुंवर कर आकारणी) अधिनियम, १९५८ याच्या कलम ५ अ अन्वये स्थापन केलेला आरोग्य व पोषण निधी | ० |
| ३ | मुंबई राज्य टंचाई निवारण निधी अधिनियम, १९५८ याच्या कलम ३ अन्वये स्थापन केलेला महाराष्ट्र राज्य टंचाई निवारण निधी | १२७१८० |
| ४ | महाराष्ट्र शिक्षण व रोजगार हमी (उपकर) अधिनियम, १९६२ अन्वये स्थापन केलेला महाराष्ट्र शिक्षण उपकर निधी | ० |
| ५ | महाराष्ट विजेच्या विक्रीवरील कर अधिनियम, १९६३ याच्या कलम ५ अन्वये स्थापन केलेला राज्य वीज निधी | १३८८६७९५ |
| | **एकूण** | **१०६६१२८२७** |

उपरोक्त रु. १०६६१,२८,२७ हजार एवढी रक्कम राज्याच्या एकत्रित निधीमध्ये पुढील लेखाशीर्षामध्ये जमा करण्यात येत आहे :-

**महसूल व जमा**
००७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा
८००, इतर जमा रकमा (००७५ ००७६)
(१५) इतर जमा

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(संतोष कुमार)
सह सचिव, वित्त विभाग

(कृ.मा.प.)

प्रति,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालयप्रमुख
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
संचालक लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद,
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवडनस्ती, वित्त विभाग, अर्थसंकल्प-१
*<u>पत्राद्वारे</u>